हास्यरसमालिका

पुष्प १२ वें.

# चहाडखोराचें प्रहसन

Chahad Khorache Prahashan

अथवा

# कळलाव्या शाख्याचा मनोरंजक फार्स.

Karlekar, G. M.

गोविंद मोरोबा कार्लेकर.

प्रसिद्ध करणार

विठ्ठल संभाजी सूरकर.

यांनीं मुंबईत "श्रीकल्पतरु" छा॰ छा॰



Sri Kalpataru Chapakhana.

सन १८९२. 1892

किंमत ४ आणे.

46




# प्रस्तावना.

जुन्या पद्धतीचे नाटककावर आपल्या पौराणिक वगैरे नाटकाच्या शेवटीं सवडीनुसार एखादा मनोरंजक, हास्यकारक, किंवा चमत्कारिक असा फार्स करीत असतात. परंतु अलीकडे संगीत मंडळ्या निघाल्यापासून तशा तऱ्हेचे फार्स क्वचितच होतात आणि त्यामुळें नवीन होतकरू नाटकमंडळ्यांस व इतर रसिक लोकांस त्या फार्सांची माहिती व उपयोग करून घेतां येत नाहीं. असें जाणून आह्मी जुनाट नाटकमंडळ्या करीत असलेले सुमारें १२ फार्स " हास्यरसमालिका " सदराखालीं छापून प्रसिद्ध केलें व हा कळलाव्या शास्त्र्याचा हास्यकारक फार्सही हल्लीं आह्मी छापला आहे. यांत दुसऱ्याच्या सांगण्यावरच दूरवर विचार न करितां भरंवसा ठेऊन वागणाऱ्या लोकांची प्रसंगविशेषीं कशी स्थिति होते हें उत्तम रीतीनें दर्शविलें आहे. हा फार्स नाटकावर मंडळ्यांस व इतर सर्व रसिक लोकांस चांगला उपयोगीं पडेल अशी आह्मास आशा आहे.

प्रकाशक.

चहाडखोराचें प्रहसन.

अथवा

# कळलाव्या शास्त्र्याचा फार्स.

---

## प्रवेश १ ला. स्थळ—रस्ता.

पात्रेंः—धोंडभट व चिटकंभट येतात.

धोंडभट—नमस्कार! चिटकंभट नमस्कार!

चिटकंभट—नमस्कार. कां अताशां स्वस्थास्वथी बेत अगदीं. कुठे कांहीं शिरापुरीचा बेत नाहीं वाटतें?

धों०—कुठून असणार! अहो, तुमच्या सारखे आह्मी ग्रामोपाध्ये थोडेच आहोंत तर शिरापुरीवर रोज रोज झोड देऊं. कुठे तरी तुमच्या सारख्यांच्या वशील्यानें कपाळाला टिळा लागला तर पाह्यचें. पण तुह्मी भेटतां कुठे?

चि०—कां न भेटायला काय झालें. रोज घरींच असतों. आज च्यार दिवस मात्र त्या रामभट टिळकाच्या मुलाला स्थळ पाहण्याच्या धांदलींत होतों.

घों०—कोणत्या? गणुला वाटतें. बरं मग, झालाका मुहूर्तनिश्चय?

चि०—रडला मुहूर्तनिश्चय! कशास कांहीं ठिकाण नाहीं आणि ह्मणे मुहूर्तनिश्चय. घोंडभट, ते आतां पूर्वी-चे दिवस विसरा बरं. अलीकडे लग्नांत विघ्नें करणारे लोक पुष्कळ आहेत. त्यांचा जेव्हां तळिराम गार हो-ईल तेव्हां वधुवरांची गांठ पडणार; नाहींतर कुशी खाजवीत स्वस्थ बसावें.

घों०—ह्मणजे, तें कांहीं जमलें नाहीं वाटतें? पण बिबा घालण्याला कारण कोण हें तर समजेल कीं नाहीं.

चि०—अहो, तुमचेच शेजारी; ज्यांना कृष्णशास्त्री च-हाडखोर ह्मणतात. त्यांनींच ह्या वधुवराच्या होणाऱ्या संगमांत व्यत्यय आणून माझी सर्व मेहनत फुकट घाल-विली. नाहींतर गेलामेला बाजार दोन तीन अवता-रांला हरकत नव्हती.

घों०—नव्हती पण आली. कृष्णशास्त्र्यासारखे पुण्य-पुरुष ह्या सगळ्या शहरांत तर काय परंतु पृथ्वींत सु-द्धां मिळणार नाहींत. धन्य आहे त्या पुरुषाची! कोणत्या-ही कार्यांत त्यांनें आपलें कसब दाखविलें नाहीं असें

नाहीं. अहो, पण काय काय हकीगत झाली ती तर सांगाल कीं नाहीं.

चि०—अहो, ते बाबदेवभट महाशब्दे, यांची ती थोरली मुलगी गोदी, हिला देण्याचा प्रथम निश्चय झाला. प्रथम सर्व देवघेवीचा ठराव होऊन त्यांत महाशब्द्यांना ३०० रुपये देण्याचें ठरून दोन्ही मांडवांचा खर्च रामभट टिळकांनी पतकरला. सर्व बोलीचाली होऊन मुहूर्त माघ वद्य ११ दिवा १४ घटकेचा ठरला होता.

धों०—बरं मग पुढें?

चि०—पुढें, हिकडलीं आणि वधूकडील माणसें सर्व तयारी करण्यास लागलीं तों काळच्या सोमवारीं हे तुमचे कृष्णशास्त्री त्या मुलीच्या बापास भेटले; आणि खोटेंनाटें, हिकडचें तिकडे करून त्याचें मन फिरविलें. अगोदरच बाबदेवभट तो! त्याला चिकित्सा करायला कांहीं सांगायला नको. आणि त्यांत कृष्णशास्त्र्याची कान फुंकणी मग काय विचारतां? अगोदरच उल्हास त्यात फाल्गुनी पौर्णिमा! काय ह्मणे नवरा मुलगा तिरवाच आहे, त्याचे जन्मकाळचे ग्रहच वाईट आहेत, अशा शंका घेऊन काल सगळी मोडामोड झाली.

घों०—त्यांत तुमच्या आमच्या भिक्षुकीला व्यत्यय आला. अगोदर अलीकडे ह्या इंग्रजी सुधारकांनीं भिक्षुकांच्या पोटावर पाय आणले, आणि लग्नें व्हायचीं तीं तारखेवर होऊं लागलीं. त्यांतूनही कोणी आपला कुलधर्म न सोडतां लग्न करण्याचा विचार केला, तर कृष्णशास्त्र्यासारख्यांनीं आपलं कसब दाखवावें आणि अशा प्रकारचें श्रय घ्यावें. अशा प्रसंगीं भिक्षुकांनीं काय करावें ?

चि०—करायचं आहे काय ? फुटक्या नशीबावर हात मारून र र करीत स्वस्थ बसवं दुसरें काय! पण मी ह्मणतों यांत कृष्णशास्त्र्याला कांहीं तरीं फायदा आहे काय ? उलट बापाच्या नांवाला कलंक मात्र. ह्याचा बाप षड्शास्त्री विद्वान होता, पण मुलगा पाहिला तर शुद्ध नंदीबैल; शिंगें नाहींत हाच कायतो फरक !

घों०—असो, आपला लाभकाळ असेल तशी कोणालाही बुद्धि होते. बरं पण आपण चाललां कुठें? जर संधान आलें तर आमची आठवण असूं द्या.

चि०—हो चाललों आहें, पण त्या कृष्णशास्त्र्यासारखा पुण्यपुरुष इथेही आपला अम्मल बसवायला

आला नाहीं तर च्यार रुपये हाताला लागतील. बघूं या आलेंच जमून तर तुह्मालाही बोलवीन.

घों०—त्याची आतां काळजी नको, सध्या चार महिने तर बघायला नको. कारण, कालच कृष्णशास्त्री काशीस जाण्यास निघून गेला.

चि०—देवानंच गाऱ्हाणें ऐकलेन ह्मणायचें! बरें विश्वेश्वर करो आणि त्या कृष्णशास्त्र्याची तिकडेच समाधी लागो! उगाच हवा कशाला मुमीभार. बरें आतां जातों, उशीर झाला. नमस्कार.

घों०—बरें आहे चला, मलाही रामाचें दर्शन घेऊन लौकरच घरीं गेलं पाहिजे. तर जातों नमस्कार. ( असें ह्मणून दोघेही जातात. )

---

## प्रवेश २ रा.

स्थळः—खेडेगांव. एक धर्मशाळा.

पात्रें—( कृष्णशास्त्री चहाडखोर येतो. )

कृष्णशास्त्री—ईश्वरानें प्रत्येक प्राण्याच्या मागें व्यवसाय लाऊन ठेवलाच आहे.कोणी नोकरी करितो, कोणी

व्यापारांत च्यार पैसे मिळवून उदरनिर्वाह करीत आहे, कोणी भिक्षुकी करतो, कोणी नानाप्रकारच्या कलाकौशल्यांत आणि कोणी विद्या शिकण्यांत गर्क होऊन गेले आहेत. कोणी साव होतो, कोणी सोदा होतो. एवंच नानाप्रकारच्या व्यवसायांत मनुष्यप्राणी बंधन पावले आहेत. देवानें जर खायला आयतें मिळावें असें केलें असतें, तर हे व्यवसाय कोणीच केले नसते. जे जे उद्योग करावे ते ते पोटाचेच. शंकरचार्यांनीं झटलें आहे. " जटिलो मुंडि लुंचित केशा ॥ काषायांबर बहुकृतवेषा ॥ पश्यंनापिनच पश्यती लोके ॥ उदर निमित्तं बहुकृत वेषः ॥ १ ॥ पोटाकरितां सर्व धंदे आणि वेश करावे लागतात. आतां मला मोठा पश्चात्ताप होतो; पण काय करूं! माझ्या उपजीवनेला चाहाडीशिवाय दुसरा मार्गच राहिला नाहीं. कितीही मनाचा निग्रह केला, तथापि " मद्यपी जसा अनेक अनर्थ घडले असतां पश्चात्ताप पावून पुन्हां मद्यपानाकडे त्याची इच्छा धांव घेते" तसा माझ्या मनाला पुन्हां पुन्हां चाहडीचा इव्यास उत्पन्न होतो. बरें, विचार करून जर पाहिलें तर मी करतों हें एक अर्थी सशास्त्र आहे. ब्रह्मऋषी नारद, पूर्व-

युगीं हेच धंदे करीत होते. मग मलाच लोकांनीं कां बरें दूषणें द्यावीं. आतां ह्मणतातनां. "नेपाळेश्वर भाळलग्न चिखला कस्तूरिका मानिती" ह्या कवीच्या उक्तीप्रमाणें त्यांचें ह्मणणें बरोबर आहे. पण मला तर असें वाटतें कीं, ही एक अकलेची हुशारी आहे. चातुर्यावांचून मलऱ्याच्या हातून असलीं कृत्यें होणार नाहींत, आणि सद्यस्थितीला असत्याचीच प्रवृत्ति बलवत्तर आहे. जो खरें बोलेल तो खरोखरच उपाशीं मरेल. दूध विक्या जरी घरीं येऊन दूध देऊं लागला तरी तें कोणी घेणार नाहीं पण कलालाचें दुकान जरी गांवाबाहेर असलें तरी मुद्दाम तिथे जाऊन कदाचित् जवळ पैसे नसले तरी दुसऱ्याचे कर्ज काढून, अगर एखादी वस्तू गहाण ठेवून, निदान चोरी करून तिचा एक तरी प्याला झोंकल्या शिवाय राहणार नाहींत. मी जोंपर्यंत ही चाहाडी करीत होतों तोंपर्यंत माझ्या ऐषआरामांत तिळमात्रही कमी पडलें नव्हतें. हा खिसा सदोदित गरम असे. आणि आताशां, आजचा दिवस गेला उद्यां जेवायला मिळतें कीं नाहीं ह्या पंचाइतींत दिवस काढतों. हर हर, धिःकार असो या माझ्या क्षणीक बुद्धीला! जना-

चें ऐकावें आणि मनाचें करावें ह्मणतात तें खोटें नव्हे. मी जर ह्या पूर्वींच्या जुनाट आणि रानटी लोकांचें ऐकून वागलों असतों तर आज ह्या प्रसंगांत कां पडलों असतों? काय ह्मणे कृष्णशास्त्री, तुमच्या वडिलांचा लौकिक केवढा आणि तुह्मी हें काय करतां? दुसऱ्याच्या कुटुंबांत कलह लावणें, लग्नांत विघ्न आणणें आणि लोकांच्या कृत्याचा बिघाड करणें हें अगदीं निंद्य आहे. पण जर मी त्या रामभटाच्या मुलाच्या लग्नांत विघ्न आणलें नसतें, तर दोनशे रुपये माझ्या बापानेंका दिले असते? ते जर नाहींत तर नुसत्या लौकिकाला आणि कीर्तिला घेऊन मला काय करायचं? मी कोणालाही बधणारा नव्हे. पण त्या यज्ञेश्वरभटाच्या बोलण्याला भुलून भोळसर कसा झालों ईश्वर जाणें। त्यानें मला सांगितलें कीं, कृष्णशास्त्री असल्या लाथालाथीच्या कृत्यानें लोक तुह्माला नांवें ठेवतात तर तुह्मी हा उद्योग सोडून काशीयात्रा करा. तें मला बरें वाटलें आणि मी काशीयात्रा केली. प्रयागांत प्रिय वस्तू सोडून द्यावी अशी चाल आहे ह्मणून मी माझी लाडकी चाहाडी तिथें ठेऊन आलों आणि आतां उपाशी मरण्याच्या

प्रसंगांत येऊन पडलों. असो. गेल्याचा शोक करून काय उपयोग? आतां पुढें काय करावें याचा विचार केला पाहिजे. ( विचार केल्यासारखें करून ) हो, जशी ती चाहाडी मला आवडत होती, तसा मीही तिला आवडत होतों; त्यावांचून तिनें मजजवळ इतके दिवस काढले नसते. तर आतां मी तिला सोडली पण तिनें मला सोडलें कीं काय हें पाहूं या. ह्या पोशाखानें राहिलों तर ऐटींत उपाशीं मरण्याची वेळ येईल, शिवाय लोकें नांवें ठेवतात, ह्मणून आतां भिक्षुकच व्हावें; ह्मणजे घृतकल्या मधुकल्या झोडायला तरी मिळतील. मग पुढचे बेत पाहावे. चाहाडी तर करायचीच. ह्याचें पागोटें त्याच्या डोकीवर ठेवल्या वांचून च्यार पैसे खिशांत पडणार नाहींत. पाहूं बरं चाहाडी सोडली ती आहे कीं गेली? आतां नांवें ठेवतील ; पण मला काय करायचें ? "कोणी वंदा कोणी निंदा आपुला स्वहिताचा धंदा" जावं तर, भूक लागली आहे. आतां कृष्णशास्त्री व्हा दिक्षित आणि चला भिक्षेला. ( असें ह्मणून जातो. )

---

## प्रवेश ३ रा.

स्थळ—तेंच खेडें ( जामगांव ) एक घर.

पात्रें—एक वृद्ध दमेकरी, त्याची बायको.

व मागाहून कृष्णशास्त्री चाहाडखोर.

( ओटीवर वृद्ध दुखणेकरी कण्हत पडला आहे

व त्याची बायको आंग चेपीत आहे

तों पडदा उघडतो. )

वृद्ध—अंः अंः आईग.( खोंकतो. ) ईश्वरा, नकोरे या यातना! अंः अंः अग, खोंकून प्राण चालला. काय करूं!

स्त्री—करायचं काय, इलाज थोडेका चालले आहेत, उगीच कण्हून काय होणार. त्या वैद्यानीं दिलेल्या गोळींतली देऊंका एखादी गोळी ! बाई नशीब हात धुवून मागं लागलं आहे त्याला काय करायचें !

वृद्ध—अग, त्या सकाळपासून दोनदां घेतल्या. अंः अंः त्यांत अंः माती सुद्धां नाहीं. अंः गुण नाहीं. तें औषध पंचवीस वेळ घेतलं ह्मणून काय होणार! अंः ( खोंकतो व दमत ), अग, ह्या अंः बावशाजवळ अंः घेपः अंः अंः मरतों प्राण चालला अंः—

स्त्री–आपण कीं नाहीं असलं भलतंच बोलूं नयेहो! ( डोळ्यांत पाणी आणून ) मग मला जगून काय करायचं आहे. माझ्यानें हे आपले विलाप पाहवत सुद्धां नाहींत पण करूं काय? दुःखणें वांटून कां घेतां येतें! त्यांतलं एक सुंठीचें कुडें तोंडांत धरावें, ह्मणजे खोकला थोडा कमी होईल.

वृद्ध–अंः, त्या सदाशिवराव वैद्याकडे गेली होतीस का? अंः अंः

स्त्री–रामचंद्राला पाठविला होता, त्यांनीं सांगितलं उद्यांच्या आदितवारीं औषध सुरू करूं ह्मणून.

वृद्ध–मरो तो वैद्य. अंः आदितवारपर्यंत मी जगतों कशाला! अंः अंः ( खोकतो. )

स्त्री–ऐकलंका, काल एक जोशी आला होता, त्याला मी विचारलं. त्यांनीं सांगितलं कीं कांहीं ग्रह अनिष्ट आहेत; तेव्हां नऊ ग्रहांसा जप करवावा. आणि कुलस्वामिणीजवळ सप्तशतीचे पाठ बसवावे ह्मणजे आराम वाटेल. आणि मलाही वाटतें कीं, मनाचा संशय फेडावा. खोव्यानाव्यापासून जर असेल तर गूण येईल. बरें औषधही सुरू ठेवावें. कां येतेंका मनाला?

दिवस तुह्माला ठेऊन घ्यावें असा विचार आहे. पण तुह्मी मनावर घ्याल तर.

कृ०–त्यांत मनावर काय घ्यायचं. भिक्षुकीचा धंदाच आहे तो. आपली मर्जी असेल तर माझी कांहीं ना नाहीं. आपल्या सारखे दाते आतां राहिले आहेत कुठे? हें इंग्रजी राज्य झाल्यापासून सगळे यस फयसशीं काम! ह्या काळांत ब्राह्मणांना कोणी विचारित नाहीं. तेव्हां नाहीं ह्मणण्याचे दिवस मागें गेले. मग कवीं पासून आरंभ करणार? उद्यां सोमवार आणि सकाळीं दोन घटका दिवसाला अमृतसिद्धीयोग आहे; मर्जी असेल तर मी तयार आहें. भिक्षुकाचा हात उताणाच असायचा?

तृ०–मुलगा घरीं आला ह्मणजे त्याला विचारून सांगतों काय तें. पण बहुधा उद्यांचाच विचार करूं.

कृ०–आपले कुटुंबांत माणसें किती आहेत?

तृ०–चौघें. आह्मी दोन, मुलगा, आणि सून, आणि दोन गडी माणसें.

कृ०–( मनांत ) ठीक आहे तर. हें मात्र संधान चांगलें आहे. इथेंच राहिलें ह्मणून आपल्या काय बापाचे दोन चव्वल खर्च होणार. पण मला संध्यासुद्धां

येत नाहीं मग जप कसा होईल? ( विचार करून ) हो न व्हायला काय झालें. गोमुखींत हात घातल्यावर लागलाच मंत्र सुचतो. मग राजेश्री कां कमी करतां, मारा एवढा सट्टा. हा म्हातारा पूर्वीच्या त्या राकट चालचाअसून देवभोळा आहे. तर यालाच खुळीवला म्हणजे काम होतें; पुढचे विचार पुढें. सध्यां टेकी तर लावावी (उघड) आपले मुलाला नोकरी आहे नां ?

वृ०—नाहीं आमची पेटी आहे. मी आतां वृद्ध झालों तेव्हां सर्व कारभार त्याच्या स्वाधीन करून राम म्हणायची वाट धरली आहे. कधीं देव मुक्त करितो तें पाहूं या.

कृष्ण०—तें जर तुह्मा आह्माला समजतें तर देव हवे होते कशाला.

वृद्धस्त्री—( दाराशीं येऊन ) ऐकलेंका. घरांत झाले आहे हो. रामभाउची वाट पाहूं नये. उठायचं होऊं द्या. आतां भटजींना स्नानाला जायला सांगा.

वृ०—बरं आहे. ( कृष्णंभटास ) उठा आतां स्नानाला, मागच्या दारीं पाणी तापलें आहे.

कृ०—ठीक आहे. ( मनांत ) देवा, कायरे हा प्रसंग! बरं चिंता नाहीं, ह्यांत तरी दोन्ही गोष्टींची प्राप्ती

करून दे ह्मणजे झालें. जेवणाची तर सोय लागलीच, पण ह्मातारा ह्मणतो घरांत सून आहे; तेवढी मिळेल तर जन्मपर्यंतही जप करीत राहीन! कशी असली तरी चालेल. जिथें दूध मिळतच नाहीं, तिथें ताकावरच तहान भागविली पाहिजे! इथे काय ह्मणाले.( उघड ) पडशी इथें ठेविली ह्मणून हरकत नाहींनां?

वृ०—छे. हरकत कशाची. पण आंतल्या ओटीवर ठेवा. ह्मणजे भितीचा संशय नको. चलावें. ( जातात. )

---

## प्रवेश ४ था.

स्थळः—वृद्धाचें घर

( कृष्णंभट एकटाच येतो. )

कृष्णंभ०-( आपल्याशीं ) बरेच दिवस आपल्याला येथें राहून झाले. मला भिक्षुकीचें मुळींच ज्ञान नाहीं; पण ती करणें नशीबीं आलें. मला देवपुजेचा कंटाळा आहे; पण ह्या भोळया ब्राह्मणाला फशिवण्याकरितां टेंळे माळा कराव्या लागतात. जप कशाचा आणि काय? पण डोळे मिटून चाहाडीचा उपाय योजीत बसावें. असो.

आतां मात्र आपला बेत सिद्धीला नेला पाहिजे. जपाची तर कालच समाप्ती झाली. आतां इथे चाहाडीची उत्पत्ति करावी. यांत आपल्याला सध्यां प्राप्ति फक्त मजा पाहण्याची. ह्या ह्यातार्‍यानें नवग्रहांचीं दानें आणि जप करविला तर ह्यालाही नवग्रहांचा तडाखा दाखविला पाहिजे. कसं बरं करावं. ( कांहीं विचार करून ) हो! युक्तीला काय तोटा! घराला आग लावायला काय उशीर लागतो. मात्र अग्नीचें साधन जवळ असलें ह्मणजे झालें. माझ्या खिशांत तर युक्तीरूप काड्यांची पेटी आहेच. पण फार दिवस न वापरल्यानें तिच्या कांड्या सर्दावल्या आहेत कीं काय हें पाह्यचें! आतां जाऊन प्रथम त्या थेरड्याला कांहींतरी गप्प झोंकून द्यावी. काय करायचें तें बोलून काय उपयोग. कदाचित् मसलत फसलीच तर फजिती व्हायची. प्रत्यक्ष करून दाखवावें यांतच मजा आहे. हर प्रयत्नानें यांच्या कुटुंबांत कलह लावायचा हें मात्र निश्चयाचें बोलणें! चला तर कृष्णंभट, युक्ती कसाला लावून चहाडीचा मासला पहा. आतां उशीर कशाला करतां.

( निघून जातो. )

प्रवेश ९ वा.

( स्थळः—वृद्ध दमेकन्याचा वाडा. )

( ओटीवर वृद्ध आपल्या आंथरुणावर खोंकत बसला आहे, तों कृष्णभट येतो. )

कृष्णंभ०–कांहो, काय चाललें आहे?

वृद्ध–चालायचं काय? ह्या यमयातना सहन करितों आहें. देवानें मरण दिलें असतें तरी चांगलें झालें असतें. पण तें कुठलें यायला! हा भोग सुटेल तेव्हांना!

कृ०–हें तर खरेंच आहे, पण ह्मण आहेना; मरायचं झालं तरीं हात पाय हालवून मरावं. आपले प्रयत्न करीत असावें मग होणें जाणें दैवाधीन.

वृ०–आतां प्रयत्न काय करायचे. औषधें उगाळून उगाळून दहा सहाणा झिजल्या! पण गूण नाहीं. आतां सगळा वैद्य मात्र उगाळून प्यायचा राहिला आहे. आजपर्यंत दोन हजार रुपये खर्च झाले आणखी काय उपाय करायचे ह्मणतां?

कृ०–अहो, पैसा पुष्कळ खर्च केला ह्मणजे गूण येतो असें कांहीं नाहीं. त्याला वैद्यच तसा हवा. अलीकडचे वैद्य काय विचारतां? नाडीज्ञान नाहीं तर नाहीं.

च, पण भावनेवरून सुद्धां रोगाची परिक्षा करितां येत नाहीं. आणि वर्तमान पत्रांतून तर 'रामबाण' 'उत्तम गुणकारी औषधें' अशा लांबचलांब जाहिराती दिलेल्या असतात. अशा वैद्यांच्या औषधांनीं काय होणार? वैद्याला मुख्य तर्कज्ञान असलें पाहिजे. त्याच्या नांवानें तर भोपळ्या एवढें पुज्य! रोगाची जर परिक्षाच झाली नाहीं, तर मोठ्या धन्वंतऱ्याच्या हातचें औषध असलें, ह्मणून गूणकां येणार आहे. मी सांगूं, तुमच्या रोगाची परिक्षाच झाली नाहीं.

वृ०—परिक्षा कां नाहीं? मला दम्यावांचून दुसरा कशाचाही उपद्रव नाहीं. परंतु भोग सरला नाहीं हें मात्र खरें आहे. नाहींतर औषधीउपाय थोडेका जाहालें?

कृ०—ह्याचेंच नांव परिक्षा नसणें तें. अहो, दमा खरा पण तो शरीररोग कीं कांहीं दैवीक उपद्रव आहे ह्याची परिक्षा झालीका? जर औषधांनीं गूण येत नाहीं तर शरीरभोग ह्मणतां येत नाहीं. ह्याला दैवीकच उपाय करणें योग्य आहे. ह्यापूर्वीं तुह्मीं कधीं कुलदेवतेची शांती केली होतीका?

वृ०—नाहीं. ही शंकाआजपर्यंत कोणी घेतलीच

नाहीं. परवां आमची ती ह्मणाली कीं, सप्तशतीच्या पाठाला ब्राह्मण बसवावा; ह्मणून आपल्याला इथें ठेऊन घेतलें.

कृ०—तर मग खरोखर तिचाच कोप हा. काल रात्रीं मी थोडासा चमत्कार पाहिला, पण इतका वेळ मी समजत होतों कीं मी तेव्हां स्वप्नच पाहत होतों; परंतु आतां माझी खात्री झाली कीं पाहिलें तें खरेंच होतें.

वृ०—तें काय सांगा तरी, ह्मणजे त्याबद्दल उपाय करूं.

कृ०—सांगायला कांहीं माझें तोंड दुसत नाहीं. पण तुह्माला त्याचा खरेपणा वाटून तत्संबंधीं तुह्मी प्रयत्न कराल तर माझ्या सांगण्याचा उपयोग. नाहींतर ह्या कानानें ऐकलें आणि ह्या कानानें सोडून दिलें तर काय उपयोग ?

वृ०—तशी गोष्ट माझ्या हातून होणार नाहीं. कायतें सांगा तुह्मी.

कृ०—सांगतोंच तर आतां. काल रात्रीं मला कांहीं झोंप आली नाहीं. मी पहांटेस तीन वाजेपर्यंत जागा होतों. तुह्मी सुमार मध्यानच्या अगोदरच झोंपी गेलां होतां. तेव्हां मध्यानरात्र झाल्याबरोबर सुमार १८।१९

वर्षांच्या वयाची एक स्त्री मी तुमच्या हांथरुणाजवळ आली असें पाहिलें.

वृ०–स्त्री माझ्या हांतरुणाजवळ आली होती? बरें मग?

कृ०–मग काय?ती स्त्री कांहीं सामान्य नव्हे. स्वरुपानें तर इतकी सुंदर होती कीं ह्या लोकीं तसली स्त्री मिळणें दुर्मिळ. तेव्हां ती देवताच होती ह्यांत कांहीं संशय नाहीं. प्रथम त्या स्त्रीनें हिकडे तिकडे पाहिलें आणि सामसूम झालेलें जाणून पटकन तुमच्या तोंडाजवळ तोंड नेऊन हुंगल्यासारखें केलें आणि चालती झाली. मी तिला तुह्मी कोण असें विचारायचें मनांत आणिलें होतें; पण तिचें तेजच कांहीं विलक्षण! मी आतां तोंडांतून शब्द काढणार इतक्यांत ती एकाएकीं नाहींशी झाली.

वृ०–हं असें झालें हां! पण आजपर्यंत माझ्या नजरेस कसें नाहीं आलें? बरें, मी तुह्माला असें विचारतों कीं, तिणें माझ्या तोंडाला तोंड लावून हुंगलें यांत तिचा हेतु काय असावा?

कृ०–अहो हेतु कशाचा? तुमची सर्व शक्ती ती आपल्या श्वासाबरोबर ओढून घेते. ह्मणूनच आपल्याला हे

कष्ट सोसावे लागतात. कारण, शक्ती नाहीं ह्मणजे अर्थांतच दमा लागणार.

वृ०—आतां मात्र जमतें खरें. पण तिला आतां उपाय काय करावा?

कु०—अहो, उपाय कसला? एकदां पकडावी आणि चवदावेंरत्न दाखवावें. पलागतीच्या माराला देव सुद्धां भितात. मग हीची कथा काय. लकडी शिवाय मकडी वळत नाहीं.

वृ०—पण तिची माझी भेट तर झाली पाहिजेनां?

कु०—भेट काय आज रात्रीं. मात्र झोंपेचें सोंग घेऊन तुह्मी जागें राहिलें पाहिजे. बरोबर मध्यरात्रीला ती येणारच. ती आली ह्मणजे मोठ्या सावधगिरीनें राहून तोंडाजवळ तोंड आणल्या बरोबर तिचा हात धरा आणि यथेछ द्या बदडगे ह्मणजे झालें. उद्यांपासून ती यायची बंद झाली कीं गूण आलाच ह्मणून समजावें.

वृ०—बरें, आज रात्रीं एवढें काम करतोंच. कंटाळून गेलों हो ह्या दम्यामुळें. पाहतों आज रात्रीं, तिची खोड जर न मोडीन तर माझें नांवच बदलून देईन.

कृ०—बरं स्नानाला जातों. आधीं जपजाप्य आटपून मग बसूं गोष्टी सांगत.

वृ०—बरं तर उठा.

कृ०—आज रात्रीं एवढें काम केलेंच पाहिजेहो. न कराल तर माझें कांहीं जाणार नाहीं. पण तुमचे हाल माझ्यानें पाहवत नाहीं ह्मणून सांगतों. (जातो.)

वृ०—(आपल्याशीं) ह्मणतातनां "तुका ह्मणें भोग सरे, गुणा येतील आंगारे" त्यांतली अवस्था. आजपर्यंत भगीरथ प्रयत्न केले पण कांहीं गुण नाहीं. पाहूं बरें आतां ह्यानें तरी गुण येतो कीं नाहीं हें. (जातो.)

---

## प्रवेश ६ वा.

### स्थळः—नेन्यांचें माजघर.

(पात्रें—चहाडखोर कृष्णंभट, व वृद्ध नेन्यांची सून रखमा.)

(कृष्णंभट. व रखमा घरांतील कामधंदा करीत आहे.)

कृ०—(आपल्याशींच) तरी मला वाटत होतें, तेंच शेवटीं खरें झालें. (उघड) वयनी, पुजेची तयारी झाली असली तर मजकडून कांहीं उशीर नाहींहो.

रखमाबाई—भटजी, पुजेची तयारी केव्हांच करून ठेविली आहे. आपण स्नानाला जावं तोंपर्यंत गंध उगाळून ठेवतें.

कृष्णं०—आपण आपलं शुद्ध राहावें. तिकडे काहींका असेनां. "दृष्टि आड तें सृष्टी आड." ठीक आहे. चालतों स्नानाला.

रख०—हें काय बाई! भटजी, आपण काय बोलतां हें? दृष्टी आड तें सृष्टी आड काय?

कृ०—नाहीं आपलं उगीच ह्मणत होतों. हत्ती गेला आतां शेंपुट राहिलें ह्मणतात तें, त्यांतली गत. १९ दिवस गेले, आतां दोन दिवसाकरितां आपण कशाला बोलावं! ठीक आहे, ज्याचें पाप तोच भोगील. आपल्याला त्यांत बोलायची गरज काय? उगीच राहून काय काय होईल तें पाहावें.

रख०—ह्मणजे, हें काय भटजी! आपण आपल्याशीच काय पुटपुटतां. कांहीं नवल विशेष तुह्मी पाहिलेंत वाटतें? कायतें सांगातरी.

कृ०—सांगूं काय, मला असल्या लावालावी आणि हिकडली चाहाडी तिकडे सांगायची मुळींच संवय नाहीं.

पण वाईट गोष्टी डोळ्यांनीं दिसतात त्या बोलल्यावांचू- न राहवत नाहीं. अरे अरे, अशा घरांत आणि अशीं कर्त्यें असावींत अँ! काय काय होईल तेवढे थोडेंच! आपल्याला बोलून काय करायचें आहे!

रख०—भटजी, बसा तरी. आपण काय वाईट गोष्ट डोळ्यांनीं बघीतलीत ती सांगा तरी तुह्मी. असलें अर्ध- वट काय बोलतां? मध्येंच थांबतां, याचें कारण काय? तुह्मी कांहीं मनांत संकोच धरूं नका हो. कोणासंबंधानें आपल्याला वाईट वाटतें.

कृ०—दुसऱ्याच्या संबंधानें वाईट वाटण्याचें कारण काय? माझ्याच संबंधानें मला वाईट वाटतें. कारण, पूर्वींच राहतेवेळीं याचा विचार करायचा. आतां बोलून काय उपयोग? आपल्याच्यानें पाहवत नाहीं तर निघून जावं, ह्याच्या सारखें सुख नाहीं.

रख०—अहो, पण निघून जाण्यासारखें काय झालें तें सांगाल कीं नाहीं? न पाहण्यासारखी वाईट गोष्ट आमच्या घरांत काय झाली ती तर सांगा. समजल्यावर त्याचा बंदोबस्त तरी करतां येईल. असें अर्धवट बो- लण्यांत काय बरें समजावें.

कृ०-काय सांगावें बाई, मला तोंडानें त्याचा उच्चार सुद्धां करवत नाहीं. अशा वृद्धापकाळीं हें ढंग अगदीं शोभत नाहींत. मला बोलण्याची गरज नाहीं पण सध्यां ह्या घरांत राहून त्यांच्या पंक्तीला बसण्याचा प्रसंग येतो ह्मणून राहवत नाहीं. अहो, हा ब्राह्मणजन्म वारंवार कां येणार आहे? एकदां आला आहे, ह्यांत जर असलीं अनन्वित कृत्यें करूं लागलों,तर तें पातक फेडावें तरी कुठें? हर! हर! तें कृत्य पाहिल्यापासून अन्नाची सुध्दां ओकारी येते. पण येवढें बरें आहे कीं, स्वयंपाक तुमच्या हातचा असतो ह्मणून. नाहींतर प्रसंग मात्र वाईट होता.

रँख०-ह्मणजे, मामंजीच्या संबंधानें तुह्मी बोलतां वाटतें! असं काय झालें?

कृ०-होबरं बाई, तुमच्याच मामंजीबद्दल! त्या थेरड्याचें नांव सुध्दां घेऊं नये असें वाटूं लागलें.आह्मास कांहीं तरी शोभेल तें केलें पाहिजेनां? येवढ्या थेरड्याला दारू पिणें शोभत नाहीं. आतां आपलें मीच पाहिलें ह्मणून गोष्ट निराळी; तिऱ्हाइतानें पाहिलें असतें तर तोंडावर थुंकले असते. त्या औषधांनीं काय

याच्यापुढें रडायचें आहे. असलीं व्यसनें बाळगून कधीं गूण यायचा नाहीं.

रख०—व्यसन आणि मामंजीच्या हातून! ही गोष्ट तर बाई मी आजपर्यंत ऐकिली नाहीं. भटजी, स्नानाला जरी उशीर जाहला तरी चिंता नाहीं; पण ही सर्व गोष्ट मला एकदां ऐकावयाची आहे आहे. काय काय झालें तें इथ्यंभूत वर्तमान मला सांगा.

कृष्णंभट—अहो सांगायचें काय तें! बाबासाहेब दमेकरी आणि वैद्याच्या औषधांनीं त्याना कांहीं गूण येत नाहीं. ह्मणून मला संशय आला कीं कांहीं तरी देवाची नड आहे ह्मणून. पण देव बिचारा कशाला नड करितो, हे सगळे परिणाम त्या आकाबाईचे आहेत. काल रात्रीं मी पाहिलें तर ह्या ह्मातान्यानें मध्यानरात्रीच्या सुमाराला जिकडे तिकडे निजानिजी झालेल्या पाहून दारू पिण्यास आरंभ केला आणि सारे रात्रभर खोकखोक खोकत होता. मी ह्मटलें हा कांहीं तरी औषध घेतो आहे. पण औषध कसलं ? जेव्हां वस्सकर घाण आली तेव्हां मला समजलें. असल्या अनाच्यारानें कधीं तरी गूण येणार आहे काय ?

रख०—भटजी, ही गोष्ट मला कांहीं खरी वाटत नाहीं. कारण आजपर्यंत जर आढळण्यांत आली नाहीं तर एकाएकीं खरें ह्मणतां येत नाहीं. अहो तें डाक्तराचें औषध असेल. त्याला सुद्धां कशीचशी वाण येते.

कृष्णं०—अहो, डोळे फुटले ह्मणून हिशोब नाहींनां बुडाला. हातच्या कांकणाला आरसा कशाला हवा? अहो, जी गोष्ट मी आपल्या डोळ्यांनीं पाहिली तिच्याबद्दल जर दुसरे नानातऱ्हेच्या गप्पा मारुं लागले तर मी कसा ऐकेन? मस्करी नाहीं सांगत, खरोखरच ह्मातारा दारु पितो. खोटें बोलून मला काय करायचं आहे.

रख०—भटजी, मला दाखऊन द्यालका? ह्मणजे मी त्याचा चांगला बंदोबस्त करितें. मेली मनाची नाहीं तर नाहीं पण जनाची तरी लाज धरावी. माझ्या नजरेला मात्र आलें पाहिजे ह्मणजे खोडच मोडतें. मामंजी झाले ह्मणून काय झालें! असला अनाचार मला अगदीं सहन व्हायचा नाहीं. भटजी, पुन्हां मामंजीच्या हातांत दारु पाहिली कीं मला येऊन सांगा.

कृष्णं०—अहो, सांगायला कशाला हवं; आपोआपच

दिसेल. तुह्माला जर प्रत्यय पाह्यचा असेल, तर आज रात्रीं ह्मातारा निजला ह्मणजे मध्यरात्रिच्या सुमारास जाऊन त्याच्या तोंडाचा वास घ्या ह्मणजे पहा कशी वस्सकन घाण येते ती. एरवीं तुमची खातरी होणार नाहीं.

रख०–माझी जर खात्री झाली तर मीहीपण मामंजींची खात्रीच करीन. हें काय मेलें! हिशोबाच्या कामाला कोणाची मितीका आहे? आज मुद्दाम जागी राहून मध्यरात्रीला मामंजी काय काय ढंग करतात ते पाहूं. ते जरकां दारु पितानां पाहिले तर आज त्यांच्या पाठीची कातडीच लोंबवितें. अरे थेरड्या, दारु प्यायला हवी काय? भटजी, तुह्मी स्नानाला जाहो; उशीर झाला. अजून गंधसुद्धां उगाळायचं आहे.

कृष्ण०–हा चाललों. मजकडून उशीर मुळींच नाहीं. (जातात)

---

## प्रवेश ७ वा.

### स्थळ–नेन्यांचें घर.

(पात्रें–वृद्ध नेन्यांची स्त्री, आणि कृष्णंभट.)

(मागच्यादारीं वृ. स्त्री वाती करीत बसली आहे तों कृष्णंभट चहाड येतो.)

कृष्णं०–कांहो आईसाहेब, काय चाललें आहे?

वृ० स्त्री०–चालायचं काय भटजी, शिवरात्र जवळ आली आहे; ह्मणून वाती करून ठेवतें आहें.

कृष्णं०–आतां आईसाहेब, आह्मालाही लौकरच निरोप मिळावा. कारण शिवरात्रीला घरीं जावें असें मला वाटतें; आणि आह्मासारख्या भिक्षुकाला येथें राहणें योग्य नाहीं.

वृ० स्त्री०–कां भटजी, इतकी जायची घाई ती कां? इथें नाहीं वाटतें करमत.

कृष्णं०–न करमायला काय झालें? परंतु ह्मणतात-ना, अंदरकी खुन राम जानें! तुमच्या घरांत एकतर अनोपत आणि दुसरें असें-(विचार करून)आपल्याला बोलून काय करायचें आहे? आहे तें ठीकच आहे. त्यांत आपल्या बापाचे काय दोन चव्वल खर्च होतात. आपण येथून गेलें ह्मणजे झालें.

वृ० स्त्री०–आहे तें ठीकच आहे ह्मणजे? यांत मी

कांहीं समजलें नाहीं. भटजी, असें काय झालें तें तर ऐकूंद्या.

कृष्णं०—सांगण्यासारख्या त्या गोष्टी नव्हेत. त्यांतून तुमच्याजवळ तर मुळींच सांगून उपयोग नाहीं. कारण दुसऱ्याच्या कुटुंबांत कलह लावण्यांत काय मजा आहे ? आपल्याच्यानें पाहवत नसलें तर आपण आपल्याकडून बंदोबस्त ठेवावा.

वृ० स्त्री०—यावरून कांहींतरी नवलविशेष आहे यांत कांहीं संशय नाहीं. भटजी, काय असेल तें सांगा माझ्याजवळ. कांहीं संशय धरण्याचें कारण नाहीं. काय झालं तें ऐकूं तर खरं.

कृष्णं०—तुमच्या तोंडाकडे पाहिलं ह्मणजे चोरून ठेववतच नाहीं. अहो, नवल ह्मणजे लहानसान नाहीं, असले प्रकार जगामध्यें पाहूं गेलें असतां मुळींच मिळणार नाहींत. पण कांहींतरी साम्य पाहिजे होतें; व वयाच्या मानानें हीं कृत्यें शोभत नाहींत.

वृ० स्त्री०—शोभत नाहीं ह्मणजे ? भटजी, कायतें तुह्मी सांगितल्यावांचून मला कांहीं समजणार नाहीं.

कृष्णं०—सांगतों तर आतां. तुमच्या घरांतला गोंधळ

तुह्माला माहित नसावा ही मोठी आश्चर्याची गोष्ट आहे! अहो, तुमची सून रखमा, त्या ह्मातार्‍याकडे जाते. आतां हें त्या यजमानाला आणि सुनेला शोभतें कां? शिव! शिव! हें मी बोलूं नये. आपल्याला काय करायचें आहे? पण किती वाईट गोष्ट ही! मी रात्रीं तें कृत्य पाहिलें तेव्हांपासून ह्या घरांतही राहण्याचा मला कंटाळा आला आहे.

वृ॰ स्त्री॰—भटजी, ह्मणतां काय तुह्मी? आमची रखमा तशी नाहींहो बायको. तुह्माला नीट दिसलें नसेल तें.

कृष्णं॰—दिसत होतें, आणि मी पाहिलें हेंही खरेंच; पण पाहिल्याबरोबर डोळे फोडून घेतले नाहींत ही मात्र माझी मोठी चूक आहे.

वृ॰ स्त्री॰—भटजी, मला कांहीं खरं वाटत नाहीं, पण असेल बाई काय नेम? आतांच्या पोरी काय करतील याचें कांहीं प्रमाण नाहीं! परंतु प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहिल्यावांचून मी कांहीं खरं ह्मणायचीं नाहीं.

कृष्णं॰—अहो, तुह्माला पाह्यचें तर आज रात्रीं बारा वाजतां मागच्यादारीं ओटीवर त्यांची भेटाभेट

होण्याचा संकेत झाला आहे; तेव्हां पहा पाहिजे तर.

वृ० स्त्री०–ठीक आहे. भटजी, आज रात्रीं मीं पाहतें. जर खरं झालं तर मनांत समजेन कीं, आजच मला वैधव्य आलें, आणि त्यांच्या पाठीची साल काढीन; आणि जर खोटें झालें तर माझें कांहीं ह्मणणें नाहीं. मग आपण मात्र खोटेंनाटें सांगितलेंत असें समजेन. मग मात्र लक्षांत ठेवा; माझ्याशीं गांठ आहे. (रागांत) अग रांडे कवटाळे रखमे, (असें ह्मणत रागानें निघून जाते.)

कृष्णं०–(आपल्याशीं) आतां आपलें एक मात्र काम राहिलें. तें कोणतें तर ह्या थेरड्याच्या मुलाला भेटायचें; ह्मणजे रात्री पुंगी वाजल्यावांचून राहणार नाहीं. बरें इतकी गोष्ट जर कदाचित फसली, तर मात्र रात्रींच गाशा गुंडाळून जाण्याचा प्रसंग आहे. बरें पाहूं पुढें काय होतें तें. (असें ह्मणून जातो.)

## प्रवेश ८ वा.

### स्थळ—नेन्यांचें घर.

(पात्रें–वृद्धनेन्यांचा पुत्र रामभाऊ व कृष्णंभट बोलत येतात)

रामभाऊ–भटजी, माझ्या मनांत होतें कीं, आणखी कांहीं दिवस तरी आपण येथें राहावें. कारण, अझून आह्माला अनिष्ट गृहांचा जप करवायचा होता. आणि बाबा आजारी, तेव्हां तुमच्यासारखें कोणी मनुष्य त्यांच्याजवळ असलें ह्मणजे पेढीवर आह्माला स्वस्थ-तेनें कामें करायला बरें. नाहींतर सगळा जिव घरीं टांगला राहतो, ह्मणून ह्मणत होतों.

कृष्णं०–अहो, राह्यला काय ? फुकट आणि आयतें जर जेवायला मिळतें आहे तर कोणी अनमान करणार नाहीं. परंतु माझें तसें नाहीं, जिथें आपलें मन नाहीं तिथें मी मुळींच राहणार नाहीं. रामभाऊ, मी खरें सांगतों, तुह्माला राग आला तर हरकत नाहीं; तुमच्या घरीं पाणीसुध्दां पिऊं नये असा मला वीट आला आहे. (कानावर हात ठेऊन) शिव। शिव। नारायणा, तुला डोळे.

रामभाऊ–भटजी, वीट येण्याला कांहींतरी कारण लागतें ?

कृष्णं०–कारण लहान कीं काय ? शुध्द गोंधळ झटला तरी चालेल. मी एवढा मोठा झालों पण आ-

पल्या नाहींबुवा असले प्रकार आढळण्यांत आले. भाऊसाहेब, आपण आपले कानांत तुळशीपत्र घालून पेढीवर बसलेले असतां; हे प्रकार आपल्या आढळण्यांत कुठून येणार ? मी पाहिलें तेव्हां मला कांपरें भरलें, ह्मटलें जिवंत घरीं जातों कीं नाहीं. पण देवानेंच बचावलें.

रामभाऊ—ह्मणजे असें झालें काय ? तुह्माला कोण मारीत होता ? भटजी, काय वर्तमान आहे तें निःसंशय मला सांगा, मी त्याचा बंदोबस्त करितों.

कृष्णं०—तें सांगतां येणार नाहीं. तो गोंधळ प्रत्यक्ष पाहाल तेव्हां खात्री होईल. मी सुद्धां तेव्हांपासून संशयांत आहे कीं, हा प्रकार खरा आहे कीं भूतचमत्कार आहे.

रामभाऊ—भूतचमत्कार आणि आमच्या घरांत ? ही गोष्ट कधीं होणार नाहीं. झोपेच्या भरांत तुह्माला एखादें स्वप्न पडलें असेल तें.

कृष्णं०—तुह्मी ह्मणा, पण मी त्यावेळेला आंगाला चिमटा सुद्धां घेऊन पाहिला. चांगल्या शुद्धींत होतों. तेव्हांच तुह्माला येऊन सांगणार होतों, पण काळोख्या

रात्रीमुळें पेढीवर येण्याचा आळस केला. खचीत भूत-चमत्कार यांत कांहीं संशय नाहीं. परवांपासून तीनदां माझ्या पाहण्यांत आला. कालमात्र जिवाची पक्की खातरी झाली.

रामभाऊ-भटजी, ऐकूनच मला अचंबा वाटतो। पण काय काय प्रकार होतो, आणि तीं भुतें काय करितात हें कांहीं सांगाल कीं नाहीं?

कृष्णं-तें कांहीं सांगतां येणार नाहीं. तुह्माला पाह्यचें असलें तर आज तुह्मी पेढीवरून सुमारें ११ वाजतां गुपचुप घरीं येऊन कोंणाला कळूं न देतां मी निजतों तेथेंच माझ्या शेजारीं येऊन निजा ह्मणजे सर्व प्रकार दिसतील. उगीच तुह्मी तरी गोंधळांत कां पडतां?

रामभाऊ-ठीक आहे, आजरात्रीं मी अकरावाजतां येतों. पण बरोबर पंचाक्षरी आणूं कीं काय? पाहिजे तर तो आमचा गणपतराव डोंगरे मंत्रविद्या चांगली जाणतो; त्याला आणतों हवा तर.

कृष्णं-पंचाक्षऱ्याचें कांहीं कारण नाहीं. तितकी

वेळच आली तर माझ्याजवळ मंत्रानें मारलेली काठी आहे तिचा उपयोग करावा ह्मणजे झालें.

रामभाऊ–ठीक आहे, पण त्याणें भुतांना दहशत बसली पाहिजे तर उपयोग.

कृष्णं–भुतें तर काय पण मोठे मोठे खवीस आणि मुंजे ही पळवील; मग भुतांची काय बिशाद!

रामभाऊ–ठीक आहे तर भटजी. आज रात्रीं पाहूं काय काय होतें तें. जातों आधीं, मला आतां ६ वाज-तां मोतीरामशेटची हुंडी पटवायची आहे. आज पेढीवरील सर्व व्यवस्था करून मग येतों तों रात्रीं जाण्याचा त्रासच ठेवित नाहीं. (जातो.)

कृष्णं०–(आपल्याशीं) ह्या बावळटांना वेडें करायला उशीरका लागतो! आजरात्रीं एवढें हें ळळिव पाहूं आणि उद्यां आपली घरची वाट धरायची! नाहींतर हीं घरगुती जिवंत भुतें जर माझ्या मागें लागलीं तर भीक नको पण कुत्रा आंवर अशी स्थिति होणार! बार तर ठेंचून भरला आहे, आतां दारु जर सरदळी असली तर मात्र आवाजाचे वांधे! असो, आह्मी अगो-दरच काय बोंब मारावी? जावेंच आतां. (जातो.)

## प्रवेश ९ वा.

स्थळ–नेन्यांचें घर. पात्रें–वृद्ध, सून, स्त्री, रा० कृ०

( मागच्या दारीं ओटीवर वृद्ध निजला आहे. )

वृ०–आजपर्यंत ह्या दुखण्याला हजारों उपाय केले पण गुण येत नाहीं. अग रांडे, तुझ्या बापाचे मी दोन चव्वल देणें आहेत ह्मणून माझी शक्ती तूं वासानें ओढून नेतेस ! आज ये तर खरी तूं. जरी मी ह्मातारा आहें तरी तुला जमीनदोस्त करीन यांत संशय नाहीं. मात्र दिसली पाहिजेस. आतां किती बेरें रात्र झाली अहेरु ! शुक्र मावळला. ११ वाजायची वेळ आली. माझी काठी कुठे आहे ती नीट सांवरून ठेवली पाहिजे. ( काठी सरसाऊन ) ये हां बया, आतां तुला खाऊ देतों। ( असें ह्मणून अंथरुणावर पडतो ) राम राम–आस्तिक–आस्तिक–कालभैरव. ( असें ह्मणून डोळ्यां-वरून पांघरून घेतो) भटजींनीं सांगितल्याप्रमाणें आतां झोंपेचें सोंग घेऊन जागें राहिलें पाहिजे. ( निजतो व घोरूं लागतो ) ( इतक्यांत रखमा वृद्धाची सून हातांत काठी घेऊन येते. )

रखमा–मेला घरांत अनाचार वाढला ह्मणजे काय

जळलं तें अन्नसुद्धां गोड लागत नाहीं. आतां एवढ्या थेरड्याला दारु पिणें शोभतें का? पाहते आतां. मेल्या औषधांनीं आणि वैद्यांनीं काय यांच्यापुढें रडायचें आहे. त्या भटजीनीं पाहिलें, आतां ते कीर्ति नेल्यावांचून सोडतील का? त्यांना काय बोल आहे. आपलाच दाम खोटा, दुसऱ्याला काय बोल लावावा. असो, मध्यरात्र झाली आतां जावें आणि भटजीनीं सांगितल्याप्रमाणें तोंडाचा वास घ्यावा. आणि जर घाण आली तर मामंजीच्या पाठीची कातडीच लोंबवितें. (असें ह्मणून हळू हळू चालूं लागते.)

कृष्णंभट-आतां मात्र मनाला जरा समाधान वाटणार आहे. काय असेल तें असो. दुसऱ्याची मारामारी आणि भांडण लावण्यासारखें दुसरें सुख नाहीं. घटकाभर मौज तरी वाटते. पाहूं बरें! जसें सोनें कसाला लावतात तशी माझी अक्कल आजही कसोटीला लावणों आहें. जर सोनें शंभरनंबरी ठरलें तर दरांत कांहीं कमी होणार नाहीं. मग मात्र पूर्वीपेक्षां ज्यास्त भावानें विकीन. बरं, आजचा हा गोंधळ एकदां सुरूं झाला ह्मणजे घटकाभर करमणूक होईल. मात्र त्या ह्मातारीला

चार तोबे बसतील. अंः बसतील तर बसतील, पण चार लोक तर हंसतील. आणि मसलत फसली तर मला जोडे बसतील. बरें, बांगड्या थोड्याच पिचणार आहेत! घोड्यावर बसणारा कधींतरी एखादे वेळीं पडतच असतो, ह्मणून त्याला घोड्यावर बसतां येत नाहीं असें ह्मणवेल काय? (पाहून) आली रे त्या ज्ञाताऱ्याची सून. आतां स्वस्थ मजा पहा कृष्णंभट!

वृ०—मध्यरात्र झाली, अजून ती अप्सरा कशी नाहीं आली? डोळे पेंगु लागले. (इतक्यांत रखमा पाऊल न वाजवितां हळू हळू हिकडे तिकडे पाहत राहून ज्ञाताऱ्याचा शोध करिते.)

वृ० स्त्री०—भटजींनीं सांगितलं तें खरं कीं खोटं हें तरी पाहूं या. उगीच मेली मनाला हुरहुर काय उपयोगीं. या दाराच्या आड आपण लपून बसावं ह्मणजे झालं. जर मलतासलता प्रकार आढळला तर हातांत काठी आहेच, हीच त्यांच्या पाठीवर फोडावी. (दारामागें उभी राहते.)

(रखमा वृद्धज्ञाताऱ्याच्या अंथरुणाजवळ जाऊन.)

रख०—हेंच तें त्यांचं अंथरूण. अरे ज्ञाताऱ्या, दांत

पडून तोंडाचं बोळकं झालं तरीं अजून दारु प्यायला हवी नाहींका ? ( असें ह्मणून तोंडाचा वास घेते इतक्यांत वृद्ध तिचा हात धरून बसतो ).

वृद्ध०—अग रांडे, आज बरी सांपडलीस. ( तिला मारुं लागतो ).

रख०—थेरड्या, लाज वाटतेंका रात्रीं चोरुन दारु प्यायला. ( दोघें मारामारी करितात, तों वृद्धस्त्री येऊन ).

स्त्री०—मेली दोघांनींही अगदींच लाज कशी सोडली ! मेल्ये पोटजळे रखमे, तुला दुनिया का ओस पडली आहे ? हीकडून तर लाजच सोडली. आठ पोरं झालीं तरीं घरांतले घरांत ढवळाढवळी करायची संवय. मेलं राहवत नव्हतं तर मी का मेलें होतें. ( तिघांच्या मारामारीचा एकच गोंधळ चालला आहे तों रामभाऊ येऊन )

रामभाऊ०—हा काय गोंधळ घरांत ? तरींच बिचारे भटजी कंटाळले ते. अग रांडे, अशा बापाला तरी बाप कुणी ह्मणावें !! पाणी नसेल तिथें डोकें मारावें. ( असें ह्मणून तिघांसही तो मारूं लागतो.)

वृद्ध०—मेलों! मेलों! नको नको. बाबानों पुरें करा, जीव चालला.

कृष्णं०—ओरडतो आहेस तोंपर्यंत जिवंत आहेस. ह्या नवगृहांचा तडाखा बरें! पण ह्यांच्या ह्या लटुपटीच्या मारण्यानें बरोबर रंग येत नाहीं. माझ्या सारखा हवा होता ह्मणजे दुसऱ्या चापकाची गरज ठेवली नसती! चौघांचीही खोडच तोडली असती!! वाहवारे अकलेच्या बहाद्दरा कृष्णंभटा, खूप मजा केलीस!

वृद्ध०—रांडे अप्सरे, तूं मला इतकें क्षीण केलेंस तरी अजून काय मारतेस? अरे अरे, ओय ओय, देवा! मरतो रें आतां. (मारतो)

रख०—ह्मातारा झालास तरी थेरड्या अजून कशारे दारु पितोस? (मारते)

वृ.स्त्री०—तुह्माला असंच हवं, आणि ह्या टवळ्या राक्षशीणीला कोणी बोलावं? (ती दोघांसही मारते.) व रामभाऊ तिघांसही मारीत सुटतो. अशा मारामारींत कृष्णंभट येऊन)

कृष्णं०—अहो, हें काय? रामभाऊ, तुह्मी तरी कांहीं विचार करा? ह्मातारा मरेल नाहींतर. वयनी, हें काय?

आईसाहेब, जरा शांत व्हा. काय गोंधळ हा ? मला अशा गोष्टीची मोठी भीति वाटते. ( सर्वांस एकीकडे करितो. )

राम०—काय करावें भटजी, हा गोंधळ पाहिलात नां ? आतां इथे काय करावें ? ह्या थेरड्याची अक्कल गेली कुठे. ( मारावयास जातो. )

कृष्णं०—( त्यास आंवरून ) रामभाऊ, शांत व्हा. असे उतावळे कां होतां ?

वृ०स्त्री०—ह्या भटजीचें इतकें काम हें. ह्यांनीं मला सांगितलें कीं तुमची सून असें असें करिते ह्मणून.

रख०—मलाही पण त्यानींच सांगितलें कीं मामंजी दारु पितात ह्मणून.

वृद्ध—तर मग भट लुच्चा आहे. मला ह्यानें सांगितलें कीं, तुमची शक्ती एक स्वर्गीची अप्सरा हुंगून नेते ह्मणून.

रामभाऊ—तर मग त्यांनीं सांगितलें तें सर्व खोटें.

कृष्णं०—खोटें कसें ? ह्यातारे बुवा ह्मणाले माझें आंग खोकून दुखतें आहे. तेव्हां चेपून नरमकरण्याकरितां मी इतका प्रयत्न केला हा.

रामभाऊ०—फार अकलेचे तारे तोडलेंत ! लाज

सुद्धां वाटत नाहीं ना सांगायला? असल्या लाथालाथीनें भटजी तुह्माला कोणी जोड्याजवळसुध्दां उभें करणार नाहीं हें लक्षांत ठेवा.

कृष्णं०—मला कुठें दुसऱ्याकडे जायचें आहे. रामभाऊ, मी आजपर्यंत चाहाडीचा धंदा करीत होतों; पण जेव्हां काशीला गेलों तेव्हां प्रयागांत तिला सोडली होती. तिला फार दिवस झाले ह्मणून ती चाहाडी माझ्याजवळ आहे कीं नाहीं हें पहाण्याकरितां हा मासला पाहिला! आतां उद्यां आमचें प्रयाण होणार तर आमच्या दक्षीणेची लौकर तयारी करावी.

राम०—ठीक आहे, आतां आह्मांला आपल्या अब्रूला भिऊन वागावें लागतें ह्मणूनच, नाहींतर तुमची चांगलीच शोभा केली असती. पण मला तसें कर्तव्य नाहीं. तरी बरें, गावांला आग देखील लावायचे तुह्मी. चला आतां उजाडत आलें, आपलें गाठोडें आटपून चालते व्हा. नाहींतर मात्र वाईट प्रसंग येईल हें लक्षांत ठेवा. ( सर्व जातात. )

समाप्त.

विक्रीस तयार.






"हतामताइ" च्या धर्तीवर रचिलेली

## नवीन हिंदु कादंबरी.

या कादंबरींत सारंग राजाची महापतिव्रता राणी शाकंबरी हिला कोणी एका दुष्ट जादुगारानें ती रात्रीं राजाच्या शेजारीं पलंगावर निद्रिस्त असतां चमत्कारिक रीतीनें एकाएकीं उचलून नेऊन एका डोंगराच्या भयंकर गुहेंत कोंडून ठेविलें. तिच्या शोधाकरितां सारंग राजानें आपल्या राज्यवैभवाचा त्याग करून बरींच वर्षेंपर्यंत दुर्घट प्रवास केला. त्या प्रवासांत त्यानें केवळ परोपकारार्थ अनेक प्राण्यांचींही संकटें दूर केलीं; आणि शेवटीं त्याच्या अचाट परोपकारबुद्धीमुळें आणि शाकंबरी राणीच्या कडकडीत पातिव्रत्यामुळें परमेश्वरानें या उभयतांची विलक्षण रीतीनें भेट करून दिली. या कादंबरींत शृंगार, विर, करुण इत्यादि रसांची कमाल केली आहे. कागद जाड व घोंटिव, छपाई सुरेख, पुठ्ठयाचें बाईन्डींग व पृष्ठें २७८ किंमत सवा रुपया. टपाल खर्च दोन आणे.

विठ्ठल संभाजी मूरकर.



दुर्गादेवीची गल्ली, गिरगांव पोष्ट, मुंबई.